**काजू प्रक्रिया उद्योगास प्रोत्साहन अनुदान देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

**शासन निर्णय क्रमांक : काप्रप्रो -२०१०/ प्र.क्र.५४८/उद्योग-२**

उद्योग,ऊर्जा व कामगार विभाग,
मंत्रालय, मुंबई -४०००३२.
दिनांक : १५ जुलै, २०१०

**प्रस्तावना :**

काजू प्रक्रिया उद्योग हा कृषि आधारित उद्योग आहे. कोकण विभागात औद्योगिक व्यवसायामध्ये काजू प्रक्रिया व्यवसाय महत्वाचा आहे. काजूचा समावेश सुकामेवा यामध्ये होत असून त्यावर मूल्यवर्धित कराचा दर दि.१.४.२०१० पासून १२.५% आकारण्यात येत आहे. सदर १२.५% मूल्यवर्धित करामुळे राज्यात काजू प्रक्रिया उद्योग व शेतकरी अडचणीत आली असल्याची निवेदने शासनास प्राप्त झाली आहेत. या अडचणींवर मात करण्यासाठी व राज्यामध्ये उत्पादित होणारा काजू व त्यावर प्रक्रिया उद्योगाला लोकप्रियता मिळवून देण्यासाठी काजू प्रक्रिया उद्योग घटकाकरीता मूल्यवर्धित कर कमी करावा अशी मागणी सातत्याने होत होती. या मागणीच्यां अनुषंगाने काजू प्रक्रिया उद्योग घटकास प्रोत्साहनात्मक अनुदान देण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय :**

उपरोक्त विषयाच्या अनुषंगाने शासन खालील प्रमाणे निर्णय घेत आहे :-

२. राज्यातील काजू प्रक्रिया उद्योग घटकांनी राज्यामध्ये उत्पादित व राज्यामध्ये अंतिमत: विक्री झालेल्या काजूच्या विक्रीवर देय असलेला १२.५% मूल्यवर्धित कर भरल्यानंतर त्यांना त्या कराची रक्कम प्रोत्साहन अनुदान म्हणून देण्यात येईल. ही सवलत दि.१.७.२०१० पासून दोन वर्षासाठी अनुज्ञेय राहील. सदर काजू प्रक्रिया उद्योग प्रोत्साहन अनुदान खालील अटींच्या अधीन राहून देण्यात येईल:-

(१) काजू प्रक्रिया घटकाने संबंधित कालावधीसाठी त्यांनी केलेल्या काजूच्या विक्रीवर १२.५% या दराने मूल्यवर्धित कराचा भरणा करणे आवश्यक आहे.

(२) काजू प्रक्रिया उद्योग घटकाने वरील अट क्र. १ नुसार काजूच्या विक्रीवर भरलेल्या मूल्यवर्धित कराबाबत संबंधित विक्रीकर सह आयुक्त (व्हॅट प्रशासन) यांनी अशा प्रकारे भरलेल्या कराचे पुरावे तपासून तसे प्रमाणपत्र देणे आवश्यक आहे.

(३)अनुदान पात्र असलेल्या काजू प्रक्रिया उद्योग घटकांने प्रोत्साहन अनुदानाचा पहिला दावा दि. १.७.२०१० ते ३०.९.२०१० या कालावधीसाठी व तदनंतरचे दावे प्रत्येक तिमाही कालावधीकरीता उद्योग संचालनालयाकडे सादर करावेत. शेवटचा दावा दि.१.४.२०१२ ते ३०.६.२०१२ या कालावधीकरीता राहील.

३.	उपरोक्त निर्णय व अटींच्या अनुषंगाने अनुदानास पात्र काजू प्रक्रिया उद्योग घटकांना, काजू प्रक्रिया उद्योग प्रोत्साहन अनुदानाचे वाटप या विभागाकडून करण्यात येईल. या अनुदान वाटपाची कार्यपध्दती उद्योग विभागाकडून स्वतंत्रपणे निश्चित करण्यात येईल.

४.	सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या सहमतीने व त्या विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र. २२१०/कराधान-१, दिनांक ३० जून, २०१० अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

५.	सदर शासन निर्णय शासनाच्या **www.maharashtra.gov.in** या संकेत स्थळावर उपलब्ध असून त्यांचा संगणक संकेतांक क्र. २०१००७१५१९३७५३००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नावांने,

**( र.ल.लखोटे )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन.**

प्रति,

महालेखापाल,(लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र -१/२, मुंबई/नागपूर.
विकास आयुक्त (उद्योग), उद्योग संचालनालय, मुंबई.
मुख्य कार्यकारी अधिकारी, म.औ.वि.म., मुंबई.
व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र पर्यटन विकास महामंडळ, मुंबई.
विक्रीकर आयुक्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
निवासी लेखापरिक्षा अधिकारी, मुंबई.
वित्त विभाग(कराधान -१) मंत्रालय, मुंबई-३२.

प्रत माहितीसाठी अग्रेषित-

मा. मुख्यमंत्री यांचे खाजगी सचिव
मा. उप मुख्यमंत्री यांचे खाजगी सचिव
मा. मंत्री ( सर्व )
मा. राज्यमंत्री (सर्व)
मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य ,मुंबई
मा. मुख्यमंत्री यांचे सचिव
प्रधान सचिव (उद्योग) यांचे स्वीय सहाय्यक
निवडनस्ती उद्योग -२